आपत्ती सौम्यीकरण अंतर्गत रेड- लाईन ब्लू-लाईन सर्वेक्षणच्या एकूण १७ कामांना प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
(आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन)
शासन निर्णय क्रमांक :- आव्यप्र-२०२४/प्र.क्र. ९०/आव्यप्र-२
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: १७ मार्च, २०२५

वाचा:-

१) आपत्ती व्यवस्थापन अधिनियम - २००५.
२) राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण,नवी दिल्ली यांच्या दि.०६.०३.२०२३ रोजीच्या मार्गदर्शक सूचना.
३) आपत्ती सौम्यीकरण कामाच्या मानक कार्यपध्दती बाबतचा शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.आव्यप्र-२०२४/प्र.क्र.०१ /आव्यप्र-२, दि.१० जानेवारी, २०२४.
४) प्रकल्प मूल्यमापन समितीचे दि. ११.०६.२०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
५) राज्य कार्यकारी समितीचे दि.०४.०७.२०२४ व ०९.०९.२०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
६) तांत्रिक मूल्यमापन समितीचे दि.२४.०२.२०२५ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

प्रस्तावना:-

केंद्र व राज्य शासनाने घोषित केलेल्या आपत्तींचे सौम्यीकरण करण्यासाठी १५ व्या वित्त आयोगाने महाराष्ट्र राज्यासाठी राज्य आपत्ती सौम्यीकरण निधी अंतर्गत (State Disaster Mitigation Fund, SDMF) सन २०२१-२२ ते सन २०२५-२६ अशा ५ वर्षांकरीता निधी मंजूर केलेला आहे. सदर निधीच्या वापराबाबत आपत्ती व्यवस्थापन विभाग, केंद्रीय गृह मंत्रालय, भारत सरकार यांनी दि. १४ जानेवारी २०२२ रोजी व राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, नवी दिल्ली यांनी दि. ६ मार्च २०२३ रोजी मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत.

२. महाराष्ट्र राज्य आपत्ती सौम्यीकरणांतर्गत राज्यातील जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणांमार्फत विविध अ-संरचनात्मक (Non-Structural) सौम्यीकरणांच्या कामांचे प्रस्ताव शासनास सादर केलेले आहेत. प्रकल्प मूल्यमापन समितीने दि. ११.०६.२०२४ रोजीच्या बैठकीमध्ये सदर कामांना राज्य कार्यकारी समितीपुढे ठेवण्याची शिफारस केली. त्यानुसार दि. ०४.०७.२०२४ व ०९.०९.२०२४ रोजी झालेल्या राज्य कार्यकारी समितीने सदर प्रस्तावांना मान्यता दिली . तद्नंतर पुन्हा दि. २४.०२.२०२५ रोजी तांत्रिक मूल्यमापन समितीने सदर प्रस्तावांना मंजूरी दिली. त्यानुसार सदर आपत्ती सौम्यीकरणांच्या कामांना प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१५ व्या वित्त आयोगाने मंजूर केलेल्या राज्य आपत्ती सौम्यीकरण निधीमधून राज्यातील आपत्ती सौम्यीकरणांतर्गत जलसंपदा विभागाच्या छ. संभाजीनगर, भंडारा, गडचिरोली, जळगाव, वर्धा या जिल्ह्यातील रेड लाईन - ब्लू लाईन सर्वेक्षणाच्या १७ कामांना खालील तक्त्यात त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या खर्चास विहित अटी व शर्तींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**विभागाचे नाव - जलसंपदा विभाग.**

| अ.क्र. | कामाचे नाव<br>रेड लाईन - ब्लू लाईन सर्वेक्षण | अंदाजपत्रकीय रक्कम (रु.) |
|---|---|---|
| १. | Demarcation of Flood lines for Prohibitive and restrictive flood zones on Kham river from Ch. ० to १७ Km - C. Sambhajinagar<br>प्रोजेक्ट कोड : १८/१८०१/FL/WRD/FLS/१ | १३,१९,१५३ |
| २. | Demarcation of Flood lines for Prohibitive and restrictive flood zones on Sukhana river from Ch. ० to २१ Km. upto Sukhana medium Project - C. Sambhajinagar<br>प्रोजेक्ट कोड : १८/१८०१/FL/WRD/FLS/२ | २७,५०,३९३ |
| ३. | Survey for Demarcation of Flood Red Line and Blue line on Waiganga River- Parsodi, Tal- Bhandara, Dist- Bhandara<br>प्रोजेक्ट कोड : ३४/३४०१/FL/WRD/FLS/१ | ९८,३२,०५९ |
| ४. | Flood estimation and Demarcation of flood line of Vainganga River - Dist- Gadchiroli<br>प्रोजेक्ट कोड : ३६/३६०८/FL/WRD/१ | ४,१४,००,००० |
| ५. | Flood estimation and Demarcation of flood line of Indravati River - Dist- Gadchiroli<br>प्रोजेक्ट कोड : ३६/३६०८/FL/WRD/२ | ३,४०,००,००० |

| | | |
|---|---|---|
| ६. | Flood estimation and Demarcation of flood line of Pranhita River - Dist- Gadchiroli<br><br>प्रोजेक्ट कोड : ३६/३६०८/FL/WRD/३ | २,३७,००,००० |
| ७. | Flood estimation and Demarcation of flood line of Parlkota River- Dist- Gadchiroli<br><br>प्रोजेक्ट कोड : ३६/३६०८/FL/WRD/४ | १,१८,००,००० |
| ८. | Flood estimation and Demarcation of flood line of Dina River - Dist- Gadchiroli<br><br>प्रोजेक्ट कोड : ३६/३६०८/FL/WRD/५ | १,२५,००,००० |
| ९. | Flood estimation and Demarcation of flood line of Godavari River- Dist- Gadchiroli<br><br>प्रोजेक्ट कोड : ३६/३६०८/FL/WRD/६ | १,२८,००,००० |
| १०. | Carrying out Survey and demarcation of Blue Line & Red Line For Hivra River of Hivra Medium Project- Pachora, Dist- Jalgaon<br><br>प्रोजेक्ट कोड : १५/१५१२/FL/WRD/FLS/१ | १९,३७,००० |
| ११. | Carrying out Survey and demarcation of Blue Line & Red Line For Bahula River of Bahula Medium Project, Tah. -Pachora, Dist.-Jalgaon.<br><br>प्रोजेक्ट कोड : १५/१५१२/FL/WRD/FLS/२ | १०,४६,००० |
| १२. | Carrying out Survey and demarcation of Blue Line & Red Line For Agnavati River of Agnavati Medium Project, Tah. -Pachora, Dist.-Jalgaon.<br><br>प्रोजेक्ट कोड : १५/१५१२/FL/WRD/FLS/३ | ०७,८७,००० |
| १३. | Carrying out Survey and demarcation of Blue Line & Red Line For Suki River of Suki Medium Project, Tah. -Raver, Dist.-Jalgaon<br><br>प्रोजेक्ट कोड : १५/१५१४/FL/WRD/FLS/१ | ३९,९३,००० |

| | | |
|---|---|---|
| १४. | Flood line survey of Dham and Yashoda river at Sakhra, Tal-Wardha, Dist. Wardha<br>प्रोजेक्ट कोड : ३२/३२०८/FL/WRD/FLS/१ | १०,००, ००० |
| १५. | Flood line survey of Dham and Yashoda river at Madni, Tal-Wardha, Dist. Wardha<br>प्रोजेक्ट कोड : ३२/३२०८/FL/WRD/FLS/२ | १०,००,००० |
| १६. | Flood line survey of Dham and Yashoda river at Sakurli, Tal--Samudrapur, Dist. Wardha<br>प्रोजेक्ट कोड : ३२/३२०६/FL/WRD/FLS/१ | १०,००,००० |
| १७. | Flood line survey of Yashoda river - Tal-Hinganghat, Dist. Wardha<br>प्रोजेक्ट कोड : ३२/३२०४/FL/WRD/FLS/१ | ४०,००,००० |
| १८. | **एकूण रक्कम** | **१६,४८,६४,६०५ /-** |

**अटी व शर्ती:**

१) या आदेशाद्वारे प्रस्तुत मंजूर केलेल्या कामांसाठी तांत्रिक मंजूरी (Technical Sanction) देणा-या सक्षम प्राधिका-याची संनियंत्रण अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

२) सदरचे काम करताना राष्ट्रीय आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, यांच्या दि.०६.०३.२०२३ रोजीच्या मार्गदर्शक सूचनांचे पालन करणे बंधनकारक राहील.

३) संदर्भीय दि. १०.०१.२०२४ व दि.१३.१२.२०२४ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेल्या आपत्ती सौम्यीकरण कामाच्या मानक कार्यपध्दतीचे ( S.O.P.) पालन करणे बंधनकारक राहील.

४) राज्य कार्यकारी समितीने दि. ०४.०७.२०२४ व दि. ०९.०९.२०२४ रोजीच्या बैठकीमध्ये दिलेले निर्णय व निर्देश यांचे पालन करणे बंधनकारक राहील.

५) नदी / नाले यांच्याशी संबंधीत रेड-लाईन - ब्लू-लाईन सर्वेक्षण/खोलीकरण/ रुंदीकरण/ ट्रेनिंग/पूर संरक्षक भिंत व अन्य तत्सम कामे जलसंपदा विभागाव्यतिरीक्त अन्य विभागामार्फत

राबविण्यात येत असल्यास संबंधित कार्यान्वयीन विभागाने प्रस्तुत कामांच्याबाबत असलेल्या जलसंपदा विभागाच्या प्रचलित धोरणानुसार विहीत केलेल्या अटी व शर्तींचे पालन करणे बंधनकारक राहील.

६) सदरचे आदेश प्राप्त झाल्यावर संनियंत्रण अधिका-यांनी तांत्रिक मान्यता, अंदाजपत्रक व डी.पी.आर. ची एक प्रत संबंधित जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणास सादर करावी.

७) प्रस्तुत कामांची निविदा प्रक्रिया राबविण्यापासून ते कामे पूर्ण होईपर्यंतच्या सर्व टप्प्यांवर सबंधित कार्यान्वयीन विभागास लागू असलेले सर्व प्रचलित नियम, शासन निर्णय, परिपत्रके व मार्गदर्शक सूचना इत्यादींची काटेकोरपणे अंमलबजावणी करणे बंधनकारक राहिल.

८) दि. १०.०१.२०२४ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आलेल्या आपत्ती सौम्यीकरण कामाच्या मानक कार्यपध्दतीमधील ( S.O.P.) परि. २.१२ मधील तरतूदींनुसार कार्यारंभ आदेश देण्यापूर्वी निविदा प्रक्रिया पूर्ण करुन न्यूनतम देकाराची निविदा (L-1) व कामाचा दर निश्चितीबाबतची शिफारस या विभागाकडे मान्यतेसाठी सादर करावी.

९) प्रस्तुत कामांना नव्याने भूसंपादन करण्याची आवश्यकता भासणार नाही याची दक्षता घ्यावी.

१०) कार्यारंभ आदेश देण्यापूर्वी ज्या कामांची तांत्रिक मंजूरी (Technical Sanction) सादर केलेले नाही त्या कामांची तांत्रिक मंजूरी ही प्रशासकिय मान्यतेच्या रकमेच्या मर्यादेतच या विभागास व सबंधीत जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांना सादर करणे बंधनकारक राहील.

११) काम करताना DGPS (Differential Global Positioning System) प्रणालीचा वापर करणे बंधनकारक राहील.

१२) प्रशासकीय मान्यता ज्या कामासाठी दिली आहे त्याच कामासाठी मंजूर निधी खर्च करावा व मंजूर निधीच्या मर्यादेतच खर्च करणे बंधनकारक राहील.

१३) सदर कामे विहित कालमर्यादेत पूर्ण करण्याची जबाबदारी कार्यान्वयीन यंत्रणेची राहील.

१४) “संनियंत्रण अधिकारी” यांनी आढावा घेऊन दरमहा ५ तारखेपूर्वी कामाचा भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल विहीत नमुन्यात या विभागास तसेच एक प्रत सबंधित जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणास सादर करावी.

१५) कामांच्या निधी/देयक मागणीचा प्रस्ताव कार्यान्वयीन यंत्रणेच्या सक्षम प्राधिका-याच्या स्तरावर तपासणीअंती विहीत प्रपत्रात शिफारशीसह या विभागास सादर करावा.

१६) कामांच्या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास व संबंधित जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणास वेळोवेळी सादर करण्यात यावे.

१७) कामे पूर्ण झाल्यानंतर त्वरीत पूर्णत्वाचे प्रमाणपत्र शासनास व संबंधित जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणास सादर करावे.

२. सदरचा शासन निर्णय राज्य कार्यकारी समितीने दि. ०४.०७.२०२४ व दि. ०९.०९.२०२४ रोजीच्या बैठकीत झालेला निर्णय व तांत्रिक मुल्यमापन समितीच्या दि. २४.०२.२०२५ च्या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयास अनुसरून व आंतरवित्तीय सल्लागार तथा सहसचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर कामास केंद्र शासन १५ व्या वित्त आयोगांतर्गत प्राप्त नियतव्ययास अनुसरुन राज्य आपत्ती सौम्यीकरण निधीअंतर्गत (SDMF) सन २०२१-२२ ते २०२५-२६ या पंचवार्षिक कार्यक्रमांतर्गत मंजूर असलेल्या निधीतून करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

४. या कामी होणारा खर्च मागणी सी-६, २२४५, नैसर्गीक आपत्तींच्या निवारणासाठी सहाय्य, ०७ आपत्ती व्यवस्थापन, १०१, आपत्ती सौम्यीकरण (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च (९१) (०१) राज्य आपत्ती सौम्यीकरण निधी (वित्त आयोग) (अनिवार्य) (२२४५ ४२३२) ३१- सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली त्या-त्या वेळी अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३१७११५४३०१५१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RATANSINGH MAHAJAN PARDESHI

Digitally signed by RATANSINGH MAHAJAN PARDESHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=8683c3d7b714d49dfd391ec34ab7bc6f1ab2319da73a07fba95b92f0d9ef34d4, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=591C4493A82FC9651507A70D7B02DFE21EC63AEEB741BB51922072AF1DF55D76, cn=RATANSINGH MAHAJAN PARDESHI
Date: 2025.03.17 11:56:56 +05'30'

**(रतनसिंह परदेशी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य तथा अध्यक्ष, राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) मा. मंत्री, आपत्ती व्यवस्थापन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई.
८) विभागीय आयुक्त, नागपूर, छ. संभाजीनगर, नाशिक.
९) संचालक, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) वित्तीय सल्लागार तथा सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन, मदत व पुनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रत: माहिती व आवश्यक कार्यवाहीस्तव.**

१) जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, छ. संभाजीनगर/ भंडारा / गडचिरोली / जळगाव / वर्धा.
२) महालेखापाल (महाराष्ट्र-१) मुंबई/ नागपूर.
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा छ. संभाजीनगर/ भंडारा / गडचिरोली / जळगाव / वर्धा.
५) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, जिल्हा छ. संभाजीनगर/ भंडारा / गडचिरोली / जळगाव / वर्धा.
६) अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग, छ. संभाजीनगर/ भंडारा / गडचिरोली / जळगाव / वर्धा.
७) कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग, छ. संभाजीनगर/ भंडारा / गडचिरोली / जळगाव / वर्धा.
८) अवर सचिव/ कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प कार्यासन, आ.व्य.म.व पु., मंत्रालय, मुंबई.
९) कक्ष अधिकारी, (व्यय-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवड नस्ती/ आव्यप्र-२.